GR200407291131530001-1100

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्रमांक आयडीएल-1095/(10049)/उद्योग-8
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 14 ऑक्टोबर 1997.

वाचा :- शासन निर्णय क्रमांक आयडीएल-1088/(6603)/उद्योग-8, दिनांक 30 सप्टेंबर 1988.

प्रस्तावना :- दिनांक 30 सप्टेंबर 1988 च्या शासन निर्णय क्रमांक आयडीएल-1088/(6603)/उद्योग-8, नुसार सामूहिक प्रोत्साहन योजना, 1988 च्या तरतुदी विहित करण्यात आलेल्या आहेत. सामूहिक प्रोत्साहन योजना, 1988 च्या योजनेतील परि. 10(4) अन्वये ऊर्जा बचत उपकरणे,नि:सृतीकरण संयंत्राची मांडणी/जोडणी व स्थानिक रोजगारा-संबंधातील प्रशंसनीय मुद्यांबाबत अतिरिक्त प्रोत्साहने देय करण्यात आलेली आहेत. प्रशंसनीय मुद्यांसंबंधातील अतिरिक्त प्रोत्साहने देय करण्याकरिता मार्गदर्शक तत्त्वे विहित करण्याची बाब ऊर्जा विभाग, पर्यावरण विभाग यांच्या सल्लामसलतीने विचाराधीन होती.

निर्णय :- सामूहिक प्रोत्साहन योजना, 1988 च्या परिच्छेद 10.4 च्या तरतुदीनुसार प्रशंसनीय मुद्यांसंबंधात अतिरिक्त प्रोत्साहने देण्यासंबंधात शासन खालीलप्रमाणे मार्गदर्शक तत्त्वे विहित करीत आहे :-

(1) ऊर्जा बचत उपकरणे -

(अ) ज्या स्वरुपाच्या ऊर्जा बचत उपकरणासंबंधात प्राप्तीकर अधिनियम/नियम यांमधील तरतुदीनुसार घसा-यापोटी सवलत अनुज्ञेय असते, फक्त त्याच उपकरणावरील गुंतवणूक ऊर्जा प्रशंसनीय मुद्यासाठी विचारात घेण्यात येईल.

(आ) जर प्राप्तीकर विभागाने अशा उपकरणांवरील गुंतवणुकीसंदर्भात उपलब्ध सवलत नंतर रद्द केली, तर सदर सवलत रद्द करण्यापूर्वी अस्तित्वात असलेल्या उपकरणांच्या यादीनुसार जी उपकरणे विचारार्ह व पात्र होती फक्त त्या उपकरणामध्ये केलेली ग्राह्य गुंतवणूक ऊर्जा प्रशंसनीय मुद्यासाठी पात्र समजण्न जाईल.

(इ) ऊर्जा बचत उपकरणातील एकूण ग्राह्य गुंतवणूक ही पात्र घटकाने केलेल्या ग्राह्य स्थिरमत्तेतील (ऊर्जा बचत उपकरणांची गुंतवणूक वगळता) नक्त गुंतवणुकीच्या 5 टक्क्यांहून कमी असता कामा नये.

(ई) ग्राह्य ऊर्जा बचत उपकरणातील गुंतवणूक ही पात्रता प्रमाणपत्राच्या कालावधीत केली असणे आवश्यक आहे.

(उ) पात्रता प्रमाणपत्राच्या कालावधीत सदर घटकाकडे विद्युत बिलाची देय रक्कम थकित असता कामा नये आणि/अथवा सदर पात्र घटक विद्युत पुरवठा अधिनियमाच्या तरतुदीनुसार कोठल्याही नियमभंगाबद्दल दोषी असता कामा नये. तसे असेल तर सदर घटक उपरोक्त प्रोत्साहनास अपात्र ठरेल आणि/अथवा त्याने उपभोगलेल्या अशा प्रोत्साहनांची नियमानुसार वसुली केली जाईल.

(ऊ) पात्र घटकाने ऊर्जा बचत उपकरणात केलेल्या ग्राह्य गुंतवणुकीबाबत तसेच सदर गुंतवणूक प्राप्तीकर अधिनियमाच्या/नियमाच्या तरतुदीनुसार कर सवलतीस पात्र असल्यासंबंधी सनदी लेखापालाच्या प्रमाणपत्रासह स्वत:चे प्रतिज्ञापत्र सादर करणे आवश्यक आहे.

(2) नि:सृतीकरण संयंत्राची मांडणी/जोडणी -

(अ) ज्या स्वरुपाच्या नि:सृतीकरण संयंत्राची मांडणी/ जोडणीच्या उपकरणासंबंधात प्राप्तीकर अधिनियम/नियम यामधील तरतुदीनुसार घसा-यापोटी सवलत अनुज्ञेय असते, फक्त त्याच उपकरणांवरील गुंतवणूक वरील प्रशंसनीय मुद्यासाठी विचारात घेण्यात येईल.

(आ) जर प्राप्तीकर विभागाने अशा उपकरणांवरील गुंतवणुकीसंदर्भात उपलब्ध सवलत नंतर रद्द केली तर सदर सवलत नंतर रद्द करण्यापूर्वी अस्तित्वात असलेल्या उपकरणांच्या यादीनुसार जी उपकरणे विचारार्ह व पात्र होती फक्त त्या उपकरणांमध्येच केलेली ग्राह्य गुंतवणूक नि:सृतीकरण संयंत्राची मांडणी/जोडणी प्रशंसनीय मुद्यांसाठी पात्र समजली जाईल.

(कृ.मा.प.

(इ) उपरोक्त उपकरणातील एकूण ग्राह्य गुंतवणूक ही पात्र घटकाने केलेल्या ग्राह्य स्थिरमत्तेतील (उपरोक्त उपकरणांची गुंतवणूक वगळता) नवत गुंतवणुकीच्या 5 टक्क्यांहून कमी असता कामा नये.

(ई) ग्राह्य अशा उपरोक्त उपकरणातील गुंतवणूक ही पात्रता प्रमाणपत्राच्या कालावधीत केली असणे आवश्यक आहे.

(उ) पात्रता प्रमाणपत्राच्या कालावधीत सदर घटकाकडे महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाची देय रक्कम, फी अथवा अधिभाराची रक्कम थकित असता कामा नये आणि/अथवा सदर पात्र घटक प्रदूषण नियंत्रण अधिनियम/नियमांच्या तरतुदीनुसार कोठल्याही नियमभंगाबद्दल दोषी असता कामा नये. तर, सदर घटक उपरोक्त प्रोत्साहनास अपात्र ठरेल आणि/अथवा त्याने उपभोगलेल्या अशा प्रोत्साहनांची नियमानुसार वसुली केली जाईल.

(3) स्थानिक रोजगार --

स्थानिक रोजगारासंबंधातील मार्गदर्शक तत्त्वे योग्य वेळी निर्गमित करण्यात येतील.

(4) सर्वसाधारण अटी/मर्यादा --

(अ) ऊर्जा बचत उपकरणे आणि/अथवा निःसृतीकरण संयंत्रांची जोडणी/मांडणीबाबत उपलब्ध प्रत्येक अतिरिक्त प्रोत्साहन हे औद्योगिक घटकाच्या ग्राह्य स्थिरमत्तेमधील गुंतवणूकीच्या 10 टक्के व अतिरिक्त 1 वर्ष कालावधीला मर्यादित राहील. सदर अतिरिक्त प्रोत्साहन व कालावधी, हा पात्रता प्रमाणपत्राचा मूळ कालावधी पूर्ण झाल्यानंतर वाढविण्यात येईल. मात्र ज्या घटकाचा पात्रता प्रमाणपत्राचा मूळ कालावधी या आदेशाच्या अंमलबजावणीपूर्वी संपलेला असेल त्या घटकास नवीन पात्रता प्रमाणपत्र निर्गमित करण्यात येईल.

(आ) पात्र औद्योगिक घटकांनी पात्रता प्रमाणपत्राच्या कालावधीत व ज्या पात्र घटकांच्या पात्रता प्रमाणपत्राचा कालावधी संपलेला आहे अगर दिनांक 14 ऑक्टोबर 1997 ते दिनांक 13 एप्रिल 1998 या कालावधीत संपणार आहे अशा घटकांनी दिनांक 13 एप्रिल 1998 पर्यन्त प्रशंसनीय मुद्यांसंबंधात अतिरिक्त प्रोत्साहनाकरिता सर्व संबंधित कागदपत्रांसह संबंधित अभिकरण संस्थेकडे अर्ज दाखल करणे आवश्यक आहे.

(इ) अतिरिक्त प्रोत्साहनांची प्रत्येकी टक्केवारी ही पात्र घटकाने योजनेच्या तरतुदीनुसार शेवटच्या अंतिम परिणाम-कारक टप्प्याच्या तारखेपासून 2/3 वर्षांत संपादित केलेल्या ग्राह्य स्थिरमत्ता गुंतवणुकीशी निगडीत असेल.

(ई) ऊर्जा बचत उपकरणे आणि निःसृतीकरण संयंत्राची मांडणी/जोडणी अशा दोन्ही बाबींची प्रोत्साहने अभिकरण संस्थेने एकत्रित करणे आवश्यक राहील.

(उ) विस्तारीकरण/विविधीकरण करणाऱ्या पात्र घटकांसाठी सुध्दा वरील नियम/मर्यादा लागू राहतील. मात्र अशा घटकांच्या बाबतीत ह्या नियमांची/मर्यादांची अंमलबजावणी त्यांच्या मान्य विस्तारीकरण/विविधीकरण प्रकल्पापुरतीच सीमित राहील.

हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक 57/97/करा-2, दिनांक 14 ऑगस्ट 1997 नुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मा. द. सरवणकर,
शासनाचे उप सचिव.

प्रति

व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम लि.,
विकास आयुक्त (उद्योग), मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, पश्चिम महाराष्ट्र विकास महामंडळ/कोकण विकास महामंडळ/मराठवाडा विकास महामंडळ/विदर्भ विकास महामंडळ,
उद्योग सह संचालक,
सामूहिक प्रोत्साहन योजना, मुंबई
उद्योग सह संचालक/सर्व विभाग,
सर्व महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्रे,
ऊर्जा विभाग/पर्यावरण विभाग/वित्त विभाग,
महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ,
मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
निवड नस्ती.